राज्यातील बँकिंग परवाना नसलेल्या नागपूर, वर्धा व बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना त्यांचा CRAR किमान ७% होण्यासाठी शासकीय भागभांडवल व अनुदान स्वरुपात अर्थसहाय्य उपलब्ध करण्यास मंजूरी देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र. बैठक-०६१३/प्र.क्र.३७५/२-स,**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**

**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**

**दिनांक : ३१/३/२०१५.**

वाचा :- १) शासन निर्णय क्र. बैठक-०६१३/प्र.क्र.३७५/२-स, दिनांक १९/६/२०१४.

२) शासन शुध्दिपत्रक क्र. बैठक-०६१३/प्र.क्र.३७५/२-स, दिनांक ३/९/२०१४.

३) शासन निर्णय क्र. बैठक-०६१३/प्र.क्र.३७५/२-स, दिनांक २७/३/२०१५.

**प्रस्तावना :-**

राज्यातील नागपूर, वर्धा व बुलडाणा जि.म.स. बँक मर्यादित या तीन बँकांना भारतीय रिझर्व्ह बँकेकडून अद्याप बँकिंग परवाना प्राप्त झालेला नाही. या बँकांनी बँकिंग परवाना प्राप्त होण्यासाठी दि. ३१/३/२०१२ पूर्वी निकषांची पूर्तता करणे आवश्यक होते. परंतु या बँका सदर निकषांची पूर्तता करु शकल्या नाहीत. या बँकांना निकषांची पूर्तता करण्यासाठी भारतीय रिझर्व्ह बँकेने दि. ३०/९/२०१२ पर्यंत मुदतवाढ दिली होती. तथापी या बँका भांडवल पर्याप्ततेची (CRAR) अट पूर्ण करु शकल्या नाहीत. या बँकांना दि. ३१/३/२०१४ च्या आर्थिक स्थितीनुसार ४% CRAR ची पूर्तता करण्यासाठी आवश्यक असलेले रु. ३१९.५४ कोटी शासकीय भागभांडवलाच्या स्वरुपात अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यास दि. १९/६/२०१४ च्या शासन निर्णयाद्वारे तत्वत: मंजूरी देण्यात आली होती.

केंद्र शासनाने दि. १७/११/२०१४ च्या पत्राद्वारे देशातील बँकिंग परवाना नसलेल्या २३ जि.म.स. बँकांचे पुनरुज्जीवन करण्याबाबतच्या योजनेस मान्यता दिली आहे. त्यामध्ये राज्यातील नागपूर, वर्धा व बुलडाणा या जि.म.स. बँकांचा समावेश आहे. सदर योजनेनुसार या तीन बँकांना वाचा क्र. ३ मधील शासन निर्णयाद्वारे अर्थसहाय्य मंजूर करण्यात आले असून राज्य शासनाच्या हिश्श्याची रक्कम रु. २१२.०० कोटी वितरित करण्यात आली आहे. केंद्र शासनाच्या योजनेनुसार नाबार्ड हिश्श्याची रक्कम रु. ३७.९७ कोटी नाबार्डकडून राज्य शासनास परतावा स्वरुपात (Reimbursement) देण्यात येणार असून सदर रक्कम प्रथम राज्य शासनाकडून संबंधित बँकांना वितरित करणे अपेक्षित आहे. त्यानुसार या बँकांना नाबार्ड हिश्श्याची रक्कम रु. ३७.९७ कोटी संबंधित जि.म.स. बँकांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या योजनेनुसार नागपूर, वर्धा व बुलडाणा या जि.म.स. बँकांची दि. ३१/३/२०१३ अखेरची आर्थिक स्थिती विचारात घेऊन दि. ३१/३/२०१५ अखेर ७% CRAR ची पूर्तता करण्यासाठी एकूण रु. ३७९.६७ कोटी अर्थसहाय्य मंजूर करण्यात आले असून त्यामध्ये केंद्र शासनाचा हिस्सा रु. १२९.७० कोटी, राज्य शासनाचा हिस्सा रु. २१२.०० कोटी व नाबार्डचा हिस्सा रु. ३७.९७ कोटी एवढा आहे. नाबार्ड हिश्श्याची रक्कम रु. ३७.९७ कोटी नाबार्डकडून राज्य शासनास परतावा स्वरुपात (Reimbursement) देण्यात येणार असून सदर रक्कम प्रथम राज्य शासनाकडून संबंधित बँकांना वितरित करणे अपेक्षित आहे. त्यानुसार नाबार्ड हिश्श्याची रक्कम नागपूर, वर्धा व बुलडाणा या बँकांना अनुक्रमे रु. १३.१७ कोटी, रु. ११.०८ कोटी व रु. १३.७२ कोटी अशी एकूण रु. ३७.९७ कोटी वितरित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर रक्कम संबंधीत बँकांनी "भाग भांडवल ठेव खाते" (Share Capital Deposit A/c) या स्वतंत्र खात्यामध्ये ठेवावी. सदर अर्थसहाय्याची रक्कम वाचा क्र. ३ मधील शासन निर्णयातील अटीस अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

या बाबीसाठी सन २०१४-१५ च्या आर्थिक वर्षात पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध केलेल्या तरतूदीमधून उपरोक्त रक्कम रु. ३७.९७ कोटी एवढा खर्च भागविण्यात यावा व खालील लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा :-

मागणी क्र. व्ही-३,
मुख्य लेखाशिर्ष-४४२५-सहकारावरील भांडवली खर्च,
(००) (१०७) - पत सहकारी संस्थांमधील गुंतवणूक,
(०४) (०२) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना भागभांडवल
(राज्य योजना ) (दत्तमत) (४४२५०७६८),
३२ - अंशदान

वरील रक्कम रु. ३७.९७ कोटी अर्थसहाय्य वितरित करण्यासाठी अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियत्रंण अधिकारी म्हणून तसेच लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्र. १९५/१५/व्यय-२, दि. ३१/३/२०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०४०११५५७४८०४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Arun Patil
Date: 2015.04.01 16:09:02 +05'30'

**( संतोष पाटील )**

विशेष कार्य अधिकारी

**प्रत :-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव. (सर्व)
३. मा. विधानसभा सदस्य / मा. विधान परिषद सदस्य. (सर्व)
४. मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त).
५. मा. प्रधान सचिव (नियोजन).
६. प्रधान महालेखाकार (लेखापरीक्षा-१/२), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. प्रधान महालेखाकार Vaucher Level Computer Section (VLC), मुंबई.
८. रिजनल डायरेक्टर, भारतीय रिझर्व्ह बँक, प्रादेशिक कार्यालय, नागपूर.
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. विभागीय आयुक्त, नागपूर व अमरावती.
१२. मुख्य महाप्रबंधक, नाबार्ड, प्रादेशिक कार्यालय, पुणे
१३. जिल्हाधिकारी, नागपूर, वर्धा व बुलडाणा.
१४. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन / ले.प.), नागपूर व अमरावती.
१५. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई.
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, नागपूर, वर्धा व बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या.

१७. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर, वर्धा व बुलडाणा.
१८. जिल्हा विशेष लेखापरीक्षण वर्ग-१, सहकारी संस्था, नागपूर, वर्धा व बुलडाणा.
१९. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
२०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नागपूर, वर्धा व बुलडाणा.
२१. कार्यासन अधिकारी (रोखशाखा) / सह सचिव (वित्त), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. वित्त विभाग (व्यय-२ व अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई.
२३. नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई.
२४. कक्ष अधिकारी (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. निवड नस्ती (२-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.